स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव या अंतर्गत विभागीय क्रीडा संकुल, मानकापूर, जि.नागपूर येथे दिनांक २२/०३/२०२२ रोजी आयोजित करण्यात आलेल्या एरो मॉडेलिंग शो करिता निधी उपलब्ध करून देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बैठक-२२२२/प्र.क्र.०८/क्रीयुसे-३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: २८ मार्च, २०२३

<u>प्रस्तावना</u> :-

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव या उपक्रमांतर्गत प्रत्येक विभागाने राज्यस्तरावर, रचनात्मक/ नावीन्यपूर्ण/स्मरणीय असा आयकॉनिक प्रकल्प सांस्कृतिक कार्य विभागास सादर करण्याचे पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाने कळविले होते. त्यानुसार स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव या उपक्रमा अंतर्गत विभागीय क्रीडा संकुल, मानकापूर, जि.नागपूर येथे दिनांक २२/०३/२०२२ रोजी एरो मॉडेलिंग शो आयोजित करण्यात आला होता. सदर कार्यक्रमाचे आयोजन करण्यासाठी रु.५०.०० लक्ष इतका निधी शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, जि.पुणे यांचेकडील निधीतून तात्पुरत्या स्वरूपात अग्रीम म्हणून वापरण्यात आला आहे. सदर कार्यक्रमाकरिता पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम यासाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

<u>शासन निर्णय:-</u>

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव या उपक्रमा अंतर्गत विभागीय क्रीडा संकुल, मानकापूर, जि.नागपूर येथे दिनांक २२/०३/२०२२ रोजी आयोजित करण्यात आलेल्या एरो मॉडेलिंग शो करिता झालेला रु.५०.०० लक्ष इतका खर्च पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम यासाठी उपलब्ध असलेल्या निधीतून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यात देण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च **“२२०४- क्रीडा व युवक सेवा - १०२- विद्यार्थ्यांकरिता युवक कल्याण कार्यक्रम-१०२ (०१) राष्ट्रीय छात्र सेना (०१) (०१) राष्ट्रीय छात्र सेना योजनेतर संगणक क्र.६ (२२०४-००१६-२१) मागणी क्र.ई-३”** या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

३. उपरोक्तप्रमाणे उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीतून शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी, जि.पुणे यांचेकडील वापरलेल्या निधीची प्रतिपूर्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. वित्त विभागाच्या दि.१६/०३/२०२३ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८१२१३२२८५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2023.03.28 12:18:46 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
३. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
४. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधान परिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई,
६. सर्व विधानसभा/ विधान परिषद सदस्य, विधान मंडळ, मुंबई,
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/नागपूर
१२. महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
१३. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर (संचालनालयामार्फत),
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, नागपूर विभाग, नागपूर,
१७. निवड नस्ती/क्रीयुसे-३.